**सन २०१८-१९ (२४०६A१८५) या योजनेअंतर्गत “बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र” (Bamboo Promotion Foundation, Maharashtra) या कंपनीची स्थापना व महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांचे कार्यालयीन खर्चासाठी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.३८५/फ-९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- ०६ फेब्रुवारी, २०१९**

**वाचा :-**

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- बांबूसा-२०१७/प्र.क्र.६८/फ-९, दि.२४.८.२०१५
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- बांबूसा-२०१७/प्र.क्र.६८/फ-९, दि. २४.८.२०१८
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- बांबूसा-२०१७/प्र.क्र.६८/फ-९, दि. १५.१०. २०१८
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर, यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/नबाप्र/चाबाप्र/प्र.क्र.८२/१२५६/२०१८-१९, दि. १५.१०.२०१८
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२ एप्रिल, २०१८
६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०१८/प्र.क्र.१३५/अर्थ-३, दि. ०५.१२.२०१८
७. महसूल व वन विभाग,शासन निर्णय क्रमांक :- पूरक-२०१८/प्र.क्र.२१९/ब-१, दि. ०६.१२.२०१८
८. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०५ जानेवारी, २०१९
९. शासन निर्णय समक्रमांकित दिनांक १० जानेवारी, २०१९

**प्रस्तावना :-**

राज्यातील बांबू क्षेत्राचे सशक्तीकरण करण्यासाठी संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र शासन आणि टाटा ट्रस्ट यांच्या भागिदारीने नफा पायाभूत नसलेल्या कंपनीची म्हणजे “बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र” (Bamboo Promotion Foundation,Maharashtra) या कंपनीची स्थापना करण्यात येऊन सदर कंपनीच्या स्थापनेसाठी सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पात एक वेळ अनुदान म्हणून रु.२०००.०० लक्ष अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे. सदर खर्च (२४०६ A१८५) या लेखाशिर्षाखाली करण्यात येईल असा निर्णय घेण्यात आला आहे.

सन २०१८ च्या हिवाळी अधिवेशनात महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना करणे (२४०६ A१८५) या लेखाशिर्षाखाली **“बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र” (Bamboo Promotion Foundation, Maharashtra)** या कंपनीची स्थापनेकरीता सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पात एक वेळ अनुदान म्हणून रु.२०००.०० लक्ष व महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांच्या कार्यालयीन खर्च, स्टेशनरी आणि

राज्यात भागधारक/हितसंबंध यांची कार्यशाळा घेणे, वनवृत्ताकरिता बांबू प्रक्रिया व साठवणूक केंद्र स्थापन करणे, राज्यातील ११ वनवृत्तात बांबू विषयक प्रशिक्षण व व्याख्यातांचे मानधन आणि हस्तशिल्प, रोपवन, लगदा/धागे, फर्निचर आणि वास्तुशिल्प कामे याकरिता तज्ञांचे शुल्क यासाठी तीन महिन्याकरिता खर्च या सर्व बाबींसाठी एकंदरीत रु.३४०.०० लक्ष असा एकूण रु.२३४०.०० लक्ष अतिरिक्त निधीची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.६ दिनांक ०५.१२.२०१८ रोजीच्या परिपत्रकान्वये सदर अर्थसंकल्पित करण्यात आलेला रु.२३४०.०० लक्ष निधी वितरीत करण्याकरीता नियोजन व वित्त विभागास विनंती केली होती. त्यावर वित्त विभागाने सद्यस्थितीत ५०% निधी वितरण करण्यासाठी दिलेल्या सहमतीनुसार संदर्भ क्र.९ नुसार "बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र" (Bamboo Promotion Foundation, Maharashtra) या कंपनीचे स्थापनेकरिता रु.१०००.०० लक्ष व महाराष्ट्र बांबू विकास मंडळा अंतर्गत विविध बाबींसाठी रु.१७०.०० लक्ष असे एकूण रु.११७०.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे. आता संदर्भ क्र.८ अन्वये वित्त विभागाने मूळ अर्थसंकल्पीत निधी व पुरवणी मागणीद्वारे मंजूर अर्थसंकल्पीत निधी याच्या एकूण ८०% निधी वितरण करण्यासाठी सहमती दिलेली आहे.

त्यानुसार सन २०१८-१९ मधील राज्यस्तरीय योजने अंतर्गत बांबू विकास मंडळ स्थापन करणे (२४०६A१८५) या **योजनेअंतर्गत "बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र" (Bamboo Promotion Foundation, Maharashtra)** या कंपनीच्या स्थापनेसाठी व महाराष्ट्र बांबू विकास मंडळासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

बांबू विकास मंडळ स्थापन करणे (२४०६A१८५) या योजनेअंतर्गत **"बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र" (Bamboo Promotion Foundation, Maharashtra)** या कंपनीची स्थापनेसाठी **रु.६००.०० लक्ष** व महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांच्या कार्यालयीन खर्च व इतर अनुषंगीक सर्व बाबींसाठी एकदंर **रु.१८२.११ लक्ष** असा एकूण **रु.७८२.११ लक्ष** इतका निधी (२४०६ A१८५) या लेखाशिर्षा अंतर्गत खालील अटींच्या अधिन राहून वितरीत करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. वितरीत करण्यात येत असलेला रु.६००.०० लक्ष निधी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दिनांक २४.८.२०१८ अन्वये **"बांबू प्रवर्तन प्रतिष्ठान, महाराष्ट्र" (Bamboo Promotion Foundation, Maharashtra)** या कंपनीच्या स्थापनेच्या अनुषंगाने व रुपये १८२.११ लक्ष निधी महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांच्याकरिता नमूद केलेल्या कार्यबाबींसाठी विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर तसेच व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी.

३. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. सदरहू रक्कम खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४. सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी प्राप्त आहे याची खात्री अपर प्रधान मुख्यवनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन विकास), म.रा. नागपूर यांनी करुन घ्यावी.

५. वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) कायदा १९८०, भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ मधील तरतुदींचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी.

६. सर्व कामे दर्जेदार होतील याबाबत योग्य शासन कार्यप्रणालीचा वापर केला जाईल व कोणतीही अनियमितता होणार नाही याची सर्व जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांची राहील.

७. मागील वर्षी सदर योजनेकरिता वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल याची दक्षता घ्यावी.

८. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकते नुसार आहरण करावे.

९. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०५.०१.२०१९ च्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१०.सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

११.शासन निर्णय दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ नियम पुस्तिकेत नमुद केल्यानुसार तसेच उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दिनांक २४ ऑगस्ट, २०१७ मध्ये नमूद गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची कार्यपध्दती नुसार निविदा प्रक्रियेत खरेदी किंमत रु.तीन लाख व त्यापेक्षा अधिक असल्यास ई-निविदा प्रणालीचा वापर करावा.

१२.शासन परिपत्रक क्र.वनबां-२०१९/प्र.क्र.२४/फ-९, दिनांक ३०.०१.२०१९ अन्वये वनविभागाकडून करण्यात येणाऱ्या कामाकरिता ई-निविदा प्रणालीचा वापर करणेबाबत दिलेल्या निर्देशाचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-७, ०१-वनिकरण प्रधान शिर्ष- २४०६, वनिकरण व वन्यजीवन, १०५ वनोत्पादने, (०१) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन, (०१) (०८) महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६ A१८५) या लेखा शिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्र.३९०/ २०१९/ व्यय-१०, दिनांक ३१.०१.२०१९ अन्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/ २०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनिमय,भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०६१७१५१६१५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2019.02.06 17:17:50 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
७. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
८. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)